**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेसाठी निधी वितरण**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०५ ७७६८)**
**राज्य हिस्सा (लेखाशीर्ष २४०५ ७७७७)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः **बीयुडी-२०२२/प्र.क्र.०७/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.४.०४.२०२२, दि.०८.०३.२०२३ व दि.१६.३.२०२३.

२) पशुसंवर्धन विभागाची नस्ती क्र.मत्स्यवि-११२३/प्र.क्र. ४६/पदुम-४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत पशुसंवर्धन विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा या योजनेचे सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील प्रलंबित दायित्व अदा करण्यासाठी केंद्र हिस्सा रु.२.०१६८० लाख व राज्य हिस्सा रु.१.३४५०० लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २४०५, मत्स्यव्यवसाय या मुख्य लेखाशिर्षांतर्गत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री मत्स्यसंपदा या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन केंद्र हिस्सा रु.२.०१६८० लाख व राज्य हिस्सा रु.१.३४५०० लाख असा एकूण रु.३.३६१८० लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र/राज्य हिस्सा | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | सदर शा. नि.द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजना | २४०५७७६८ (केंद्र हिस्सा ३६ टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ११८४.९८ | २.०१६८० |
| | २४०५७७७७ (राज्य हिस्सा २४ टक्के) | | ७९०.०० | १.३४५०० |
| | **एकूण** | | **१९७४.९८** | **३.३६१८०** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.३.३६१८० लाख (अक्षरी रुपये तीन लाख छत्तीस हजार एकशे ऐंशी फक्त) इतका निधी** प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, मत्स्यव्यवसाय विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२७४-२०२३/व्यय-१४, दि.१७.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१७२००००८५९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.03.27 18:06:22 +05'30'

**(राजेंद्र दे. भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (मत्स्यव्यवसाय), कृषी, पशुसंवर्धन विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.